# आमची स्वतःची एक बस

लेखक : फ्रेडी विल्यम्स इव्हान्स
रेखाचित्रं : शॉन कॉस्टेलो
अनुवाद : नीलांबरी जोशी



शाळेत जाऊन शिकता यावं ही मेबल जीनची सर्वात मोठी इच्छा आहे. पण शाळा पाच मैल लांब होती. एका लहान मुलीच्या मानानं हे अंतर जरा जास्तच आहे, विशेषत: थंडीत आणि पावसाळ्यात. शाळेत चालत जाताना मेबल जीन आणि इतर आफ्रिकन-अमेरिकन मुलांना एक बस दिसते, “ज्यातून गोरी मुलं त्यांच्या शाळेत जातात. आमची स्व:ची अशी एखादी बस का बरं नाही?” हा प्रश्न मेबल जीन अखेरीस आपल्या आईवडिलांना एक दिवस विचारतेच.

सत्यघटनांवर आधारित “आमची स्वत:ची एक बस” ही मुलांच्या शिक्षणासाठी एकजुटीनं उभ्या राहिलेल्या एका समुदायाची कथा आहे. फ्रेडी इव्हान्सची ही हृदयस्पर्शी कथा वाचकांना प्रेरणादायक वाटेल यात शंकाच नाही. शॉन कॉस्टेलोची चित्रं १९४० आणि १९५० या दशकांमधला काळ नजरेसमोर हुबेहूब उभा करतात.

# आमची स्वतःची एक बस



लेखक : फ्रेडी विल्यम्स इव्हान्स
रेखाचित्रं : शॉन कॉस्टेलो
अनुवाद : नीलांबरी जोशी

माझे दिवंगत मामा सी डब्ल्यू स्मिथ कॉटन आणि जो ई कॉटन सीनिअर; मामेभावंडं कॅरी बेल लुईस आणि मेबल लुईस सीटन; ज्या माणसांनी या बसमधून पहिली फेरी मारली किंवा त्यात मदत केली; कॉलीन सॅली आणि पॅट्रिशिया मॅककिसॉक यांना..

- एफ.डब्ल्यू.ई.

माझा मुलगा डु कॉस्टेलो याला,

- एस.सी.



“भराभर चालायला हवं मेबल जीन”, जेफ ठामपणे म्हणाला. मेबल जीननं भराभर चालण्याचा खूप प्रयत्न केला. पण तिला ते जमलं नाही. याचा परिणाम म्हणून ती आणि तिचा भाऊ इतर मुलांपेक्षा खूप मागे पडले होते.

“मी तुला उचलून घेणार नाही” तो जरा कठोरपणेच म्हणाला. “तू जर सगळ्यांबरोबर चालू शकत नसशील, तर तुला शाळेत जाण्याऐवजी घरी बसावं लागेल.”
“मी पटापट चालेन.” ती पुटपुटली.

मेबल जीनला त्यांच्या वडिलांनी जे सांगितलं होतं त्याचीच आठवण जेफ करुन देत होता. “जर तू पाच मैल पायी चालू शकणार नसशील, तर तुला पुढच्या वर्षीपर्यंत घरीच बसावं लागेल”. ते म्हणाले होते. पण मेबल जीनला शाळेत जायची तीव्र इच्छा असल्यानं तिला कोणीच अडवू शकत नव्हतं.

मेबल जीनला सोबत घेऊन जेफ वर्गात पोचेपर्यंत शाळा सुरु झाली होती. “पाणी प्या आणि थोडा वेळ विश्रांती घ्या..” त्यांची वर्गशिक्षिका - मिसेज पॉवेल म्हणाल्या.

मेबल जीन इतर मुलांबरोबर वर्गात येऊन बसेपर्यंत चीनी-बेरीज मोजून शिकण्याची वेळ झाली होती. तिनं पंधरापर्यंत त्या बेरीज मोजल्या. “व्वा.. छान.. मेबल जीन..” मिसेस पॉवेल म्हणाल्या. “आता इतर मुलांना मदत कर.”






शाळा सुटल्यावर मेबल जीन आणि इतर मुलं रस्त्याच्या कडेकडेनं चालत घरी निघाले. “तुम्ही पुढं व्हा..” जेफ त्याच्या मित्रांना म्हणाला. “मला मेबल जीनच्या बरोबर चालावं लागेल”. ते चालत असताना कित्येक गाड्या रस्त्यावरुन गेल्या. त्यात एक स्कूल बसही होती. पण त्यात फक्त गोरी मुलं होती.

“ना ना ना ना, तुम्हाला पायीच चालावं लागणार..” त्या गो-या मुलांनी मेबल जीन आणि चालत निघालेल्या मुलांची टवाळी केली. त्यांनी काही अपशब्दही वापरले. तिनं घाबरुन जाऊ नये यासाठी जेफनं मेबलचा हात धरला.

ते हेंडरसन कुटुंबाच्या इस्टेटीवरुन छोट्या सडकेवरुन पुढे निघाले. अचानक मेबल जीन ओंडक्याला जोरात अडखळली. पायाला लागल्यामुळे शेकडो मधमाश्यांचा डंख बसावा तशी कळ उठून मस्तकापर्यंत गेली. तिचा पाय लचकला आणि ती पडली. “चल, उठ, मेबल जीन.” जेफनं थांबून तिला उठायला मदत करायचा प्रयत्न केला.

“मी माझी चालेन..” असा तिचा हट्ट होता. पण तिला उठवतही नव्हतं. जेफनं आपण तिला उचलणार नाही हे परत एकदा सांगितलं. पण केलं मात्र तेच..!

वडिलांचं म्हणणं आठवून मेबल जीनच्या पायातल्या वेदनेपेक्षा मनात जास्त दुखत होतं



“जर काही दिवस पायावर भार दिला नाहीस, तर तो लवकर बरा होईल”. आई तिला बिछान्यावर झोपवताना म्हणाली. पण वडिल काय म्हणतील याची मेबल जीनला जास्त चिंता वाटत होती.

“मेबल जीनला शाळेपर्यंत चालत जाणं अवघड पडतंय असं वाटतं..” शेतावरुन परत आल्यावर तिचे वडिल म्हणाले.

“पापा, मला पुढच्या वर्षापर्यंत घरात बसायला सांगू नका ना..” तिनं विनंती केली. “पायाला लागणं हा एक अपघात होता. मी शाळेपर्यंत चालत जाऊ शकते. मला अजून एक संधी द्या.”

वडिलांनी मान झुकवली. ते शांत होते.

“अच्छा,” ते अडखळत म्हणाले, “अच्छा, परत एकदा प्रयत्न करु.”

“धन्यवाद.. पापा.” ती म्हणाली आणि वडिलांचं मत परत बदलायच्या आधी कुशीवर वळून झोपी गेली.



ज्या दिवशी मेबल जीन परत शाळेत गेली, तेव्हा पाऊस पडून गेला होता. शाळेची बस तिच्याजवळून गेली तेव्हा तिच्या आणि जेफच्या अंगावर गढूळ पाणी उडलं. मेबल जीनचे बूट खराब झाले आणि भिजले. तिचे पाय त्या बुटांच्या आत खूप घसरत होते त्यामुळे त्यावर घट्टे पडले.

“पुढच्या वेळी बूट भिजले तर ते काढून ठेव..” तिच्या आईनं सांगितलं. “आत्ता मिठाच्या पाण्यात पाय बुडवलेस तर पायांना आराम वाटेल, पण पायांची अवस्था पाहून तुला काही दिवस घरीच बसावं लागेल असं दिसतंय.”

“घरी रहावं लागेल?” मेबल जीनला रडूच फुटलं. “मला शाळेत जायचं आहे. गो-या मुलांसारखं आपण स्कूल बसमधून शाळेत का जाऊ शकत नाही?”

“मेबल जीन..” तिच्या वडिलांनी उत्तर दिलं. “तुला ठाऊक आहे ना.. जे लोक इथला कारभार चालवतात ते आपल्यासाठी स्कूल बस देऊ शकत नाहीत.”

“तुम्ही कोणाला तरी सांगून एक बस मिळवून देऊ शकत नाही का, पापा?” मेबल जीननं विचारलं.

वडिलांनी मेबल जीनला मिठीत घेतलं आणि म्हणाले, “इतकं सोपं नाही ते बेटा. मला पण तसं वाटतं, पण कोणाशी बोलावं हेच सुचत नाही.”

त्या दिवशी संध्याकाळी मेबल जीननं आपल्या आईवडिलांचं संभाषण ऐकलं. वडिल म्हणत होते, “तुला तर माहिती आहे की ही जमीन आपली नाही. आपण जरा जरी आवाज काढला किंवा काही समस्या उभी केली, तर इथून लाथ मारुन हाकलून देतील.”



“आम्हाला तुझी आठवण आली,” जीन मेबल परत शाळेत गेल्यावर मिसेस पॉवेल म्हणाल्या. “तू परत आलीस याचा आम्हाला आनंद वाटतो.”

“मला पण शाळेत आल्यावर खूप छान वाटतंय.” ती म्हणाली. “मला शाळा आवडते. पण मला परत काही दिवस शाळेत येणं थांबवावं लागणार. यावेळी हिवाळ्यामुळे.”

”मला देखील.. ” हेन्री म्हणाला. “थंडीत शाळेत आलो तर मला खूप सर्दी होईल असं माझ्या आईनं सांगितलं आहे.”

“आजच सकाळी मला रस्त्यांवर बर्फाचा थर दिसला.” सॅमनं पुष्टि जोडली.

“तुम्ही आमच्यासाठी एक स्कूल बस विकत घेऊ शकता का, मिसेस पॉवेल”. मेबल जीननं विचारलं. “आपल्याकडे स्कूल बस असती तर आम्हाला शाळेत येणं अधूनमधून थांबवावं लागलं नसतं.”

“ज्यांच्याशी मला बोलता येईल आणि जे माझ्या ओळखीचे आहेत, ते लोक इथला कारभार चालवतात”. त्यांनी उत्तर दिलं. “तुझ्या आईवडिलांनी त्यांना सांगायला हवं.” मिसेस पॉवेल हे म्हणत असताना मेबल जीनला वडिल तिच्या आईला काय म्हणत होते ते आठवलं. कोणतीच नवीन समस्या उभी केलेली त्यांना नको होती हे तिला कळत होतं.



त्या दिवशी दुपारी मेबल जीन आणि जेफ घरी जात असताना एक अलिशान काळ्या रंगाची गाडी त्यांच्याजवळ येऊन थांबली. “जेफ,” त्या ड्रायव्हरनं हाक मारली आणि तो म्हणाला, “बस गाडीत, मी तुला आणि छोट्या मेबलला घरी पोचवतो.”

तो त्यांचा चुलतभाऊ स्मिथ होता, जो शहरातून आला होता. त्याच्याकडे चिक्कार शेती होती आणि तो शेतीत काम करायला मजुरांना पगार द्यायचा. जेफ आणि इतर मुलंही अधूनमधून त्याच्या शेतात कापूस वेचून पैसे मिळवायचे.

मेबल जीन मागच्या सीटवर सरकून बसली. तिच्यानंतर जेफही आत शिरला. त्याआधी ती इतक्या अलिशान गाडीत कधीच बसली नव्हती. ती खूप महागडी असणार हे तिला ठाऊक होतं. जर स्मिथकडे अशी गाडी विकत घ्यायला पैसे होते.. तर कदाचित..

“स्मिथ,” तिच्या घरासमोर गाडी थांबल्यावर ती म्हणाली.

“काय गं, मेबल..” त्यानं विचारलं.

“असं आहे..” ती जरा अडखळली. “तू आमच्यासाठी एक बस आणू शकशील का? मला आणि माझ्या वर्गमित्रांना हिवाळ्यामुळे शाळेत जाणं बंद करावं लागणार आहे. जर बस असती तर आम्हाला तसं करावं लागलं नसतं. आणि माझ्या पायांना पण सारख्या ठेचा लागल्या नसत्या, जशा आत्ता लागल्या आहेत.”

”बस? मला मदत करायला आवडेल मेबल. पण मला बसबाबत काहीच माहिती नाही.”



स्मिथनं बसबाबत माहिती काढावी अशी मेबल जीन प्रार्थना करत होती. काहीच वेळात तसं घडलंही. पुढच्याच आठवड्यात तिच्या घरासमोर स्मिथची गाडी येऊन थांबली. ती आशेनं बाहेर पळत आली.

“मागच्या आठवड्यात छोट्या मेबलनं मला -मी एक स्कूल बस आणू शकतो का?” असं विचारलं होतं. स्मिथ मेबल जीनच्या आईवडिलांना सांगत होता. “मी यावर विचार करत होतो. मी बस खरेदी करायला तयार आहे, पण सगळ्या मुलांच्या आईवडिलांनी मला मदत करायला हवी अशी माझी अट आहे. त्यांनी बसमधून जा-ये करायला मुलांना पैसे द्यायला हवेत. आपण सगळे कर भरतो आणि कायद्यानं आपल्या मुलांना स्कूल बस मिळायला हवी हे मला ठाऊक आहे. पण आपली मुलं शिकून-सवरुन मोठी व्हावीत यासाठी आपल्याला दुप्पट खर्च करावा लागेल असं वाटतं.”

“इतर पालक काय म्हणतात त्याबद्दल मी जाणून घेते.” मेबल जीनची आई म्हणाली.



पुढच्याच रविवारी मेबलच्या आईनं चर्चमध्ये जाहीर केलं, “आमचा भाचा स्मिथ यानं आपल्या मुलांसाठी स्कूल बस खरेदी करायची योजना आखली आहे. पण आपल्याला त्याला मदत करावी लागेल. आपल्या मुलांनी त्यातून प्रवास करण्यासाठी वेगळे पैसे द्यावे लागतील. ज्यांना या प्रयत्नात सामील व्हायचं असेल त्यांनी प्रार्थना संपल्यावर बाहेरच्या झाडाखाली मला भेटा.”



“आमच्या मुलांना पुढे जायचं असेल तर चांगलं शिक्षण मिळायला हवं. पण जर ते शाळेतच पोचू शकले नाहीत तर शिक्षण कसं घेतील?”

प्रार्थनेनंतर झाडाखाली जमा झालेल्या लोकांना मेबल जीनची आई हे सांगत होती.

“मी इस्त्री करण्याचं काम करुन पैसे मिळवीन”. मिस मॅकडोनाल्ड म्हणाल्या.

“मी शाळा सुटल्यावर कापूस वेचीन.” हेन्रीचा मोठा भाऊ म्हणाला.

“मी कपडे धुवायचं अजून एक काम धरेन.” मिस राऊसर म्हणाल्या.



“इतर मुलांचे आई वडिलही बसमधून प्रवास करण्यासाठी पैसे द्यायला तयार झाले. आपल्याला ज्या गोष्टीची सुरुवात व्हावी अशी इच्छा होती, ती झाली आहे.” मेबल जीनची आई आनंदानं म्हणली.






स्मिथनं आपला शब्द पाळला. त्यानं गो-या मुलांना शाळेत ने-आण करणारी एक जुनी बस खरेदी केली. पण तिची इतकी दुर्दशा झाली होती की घरापर्यंत पोचण्याआधीच ती वाटेत बंद पडली. “हिचा उपयोग होईल असं वाटत नाही..” आपल्या ट्रॅक्टरला ती बस बांधून आणताना मेबल जीनचे वडिल म्हणाले.

“हो.. पण कित्येकवेळा एक गोष्ट करण्यासाठी दोन गोष्टींची गरज लागते.” स्मिथ उत्तरला. “एक बनवायला दोन?” मेबल जीनला आश्चर्य वाटलं. मेबल जीन विचारात पडली. मग तिला आठवलं, तिची आजी दोन पोती एकत्र करुन एक कमीज शिवायची.






स्मिथनं बस तर खरेदी केली. मेबल जीन आपल्या मित्रांना तक्रारीच्या सुरात म्हणाली. “पण ती खूप जुनी असल्यामुळे चालतच नाही. माझे वडिल ती दुरुस्त करायचे प्रयत्न करती. पण मग ती नीट झाली नाही तर आपल्याला चालतच शाळेत जावं लागेल.”

“माझे वडिल गाड्या दुरुस्त करतात. मी त्यांना बसबाबत विचारतो”. सॅम म्हणाला.

“मी पण माझ्या वडिलांना मदत करायला सांगतो”. हेन्री म्हणाला.

त्या शनिवारी ते स्मिथच्या घरी पोचले तेव्हा सगळ्यांना आश्चर्य वाटलं. तिथे एकाऐवजी दोन जुन्या बसेस उभ्या होत्या.





"सगळ्यांच्या मदतीनं दोन्ही बसेसमधून चांगले भाग काढले, ज्यामुळे ते एकत्र जोडून एक चांगली बस तयार होऊ शकेल."

"मला इंजिन पाहू दे.." सॅमचे वडिल म्हणाले.

"मी चाकं दुरुस्त करतो." हेन्रीचे वडिल म्हणाले.

"मी बसमधे फरशीसारखं अंथरायला लाकूड आणलं आहे." लुईसचे वडिल म्हणाले

मेबल जीनचे वडिल आणि भाऊ यांनी दोन लांब बाक बनवले.

"मला पण मदत करायची आहे". मेबल जीन चिवचिवली.

"तू रंगवायला मदत करु शकतेस". तिच्या वडिलांनी सुचवलं. जेव्हा बाकं सुकली तेव्हा त्यांनी खिडक्यांखाली दोन्ही बाजूंना बसवली. बसचा आतला भाग आता तयार झाला होता. लवकरच त्यांनी बाहेरुन पण तयार केला.



बसमधून शाळेत जायच्या दिवशी मेबल जीन आणि जेफ बसस्टॉपवर खूप लवकर पोचले. कुटुंबातले लोक, मित्र आणि शेजारी त्यांच्यासोबत उभे होते.

"ते पहा.. बस आली." मेबल जीन आनंदानं ओरडली. सगळयांनीच बस आल्यावर टाळ्या वाजवल्या आणि हात उंचावून तिचच स्वागत केलं.

"स्मिथ, आमच्यासाठी बस मिळवून दिल्याबद्दल तुझे आभार." मेबल जीन बसमध्ये चढताना म्हणाली. तिनं स्मिथच्या हातात पाच सेंट दिले आणि बरोबर त्याच्या मागच्या बाकावर जाऊन बसली.

बस सुरु झाल्यावर लोकांनी आनंद व्यक्त केला. अखेरीस, सगळी कृष्णवर्णीय मुलं स्कूलबसमधून शाळेत जाताना दिसली होती.

हे दृश्य पहायला दुप्पट पैसे देणं उचितच होतं असं सगळयांनाच वाटत होतं.

## लेखकाचं मनोगत

सत्यघटनांवर आधारित असलेली “आमची स्वत:ची एक बस” ही कथा मॅडिसन, मिसिसिपीमधल्या रिडली हिल बॅप्टिस्ट चर्चच्या आफ्रिकन-अमेरिकन समूहाच्या मनोवृत्तीची निदर्शक आहे. दुस-या महायुध्दानंतर नागरिकांच्या हक्कांबद्दल अमेरिकेत आंदोलनं झाली त्या काळात ही कथा घडते. आफ्रिकन-अमेरिकन नागरिक तेव्हा कर भरत होते, त्यांच्या स्वत:च्या शेतजमिनी होत्या, तरीही त्यांना शाळा, शिक्षण किंवा शाळेपर्यंत पोचायची साधनं अशा अनेक बाबतीत विषमतेनं वागवलं जायचं.

मेबल जीनच्या कुटुंबाप्रमाणेच जास्तीत जास्त आफ्रिकन-अमेरिकन कुटुंबांकडे स्वत:ची जमीन नव्हती. ते खंडानं शेती करत होते. त्यामुळे त्यांना पिकांमधला एक हिस्सा मिळत होता, जो त्यांच्या मेहनतीच्या मानानं काहीच नसायचा. ही व्यवस्था खंडक-याला जमीनमालकाचा कायम कर्जदार करुन ठेवायची किंवा त्याला गुलाम म्हणूनच रहाण्याशिवाय पर्याय उरायचा नाही.

१९४९ मध्ये, ज्यांची मुलगी मेबल मॅक्सिन या कहाणीची नायिका मेबल जीन आहे त्या मिसेस कॅरी बेल लुईसच्या नेतृत्वाखाली समूहातल्या इतर पालकांच्या मदतीनं क्लिफ्टन डब्ल्यू स्मिथ कॉटन यानं आफ्रिकन-अमेरिकन मुलांसाठी पहिली बस विकत घेऊन चालवायला सुरुवात केली.

सामूहिक प्रयत्नांमुळे १९५० मध्ये मॅडिसन काऊंटीच्या स्कूल समितीनं श्री कॉटन यांच्याबरोबर एक करार केला. त्यानुसार कॉटन दोन बसेसची व्यवस्था करतील आणि समिती त्यांना दरमहा १२० डॉलर देईल असं ठरलं. तेव्हा त्यांचा धाकटा भाऊ जो ई कॉटन यानं दुसरी बस विकत घेऊन चालवायला सुरुवात केली. १९५४ मध्ये काऊंटीनं आफ्रिकन-अमेरिकन मुलांसाठी स्कूल बसेस उपलब्ध करुन दिल्या आणि त्यासाठी चालकही नियुक्त केले. “ब्राऊन विरुध्द बोर्ड ऑफ एज्युकेशन” या खटल्याचा निकाल लागला तेच हे ऐतिहासिक वर्ष होतं, ज्याद्वारे वर्णद्वेषावर आधारित वागणूक देणा-या अमेरिकेतल्या शाळा अल्पसंख्यांकांना शिक्षणापासून वंचित करत आहेत आणि त्या संविधानानुसार वैध नाहीत असा निर्णय कोर्टानं दिला.

मेबल मॅक्सिन लुईस (नंतर सीटन) हिनं स्थानिक शाळेत आठवीपर्यंत आणि मिसिसिपीमधल्या “टुगलू प्रिपरेटरी स्कूल”मधून हायस्कूलपर्यंत शिक्षण घेतलं. १९६८ मध्ये तिनं टुगलू कॉलेजमधून एलिमेंटरी एज्युकेशन या विषयात बीएची पदवी घेतली.